**कै.बाळासाहेब सावंत यांच्या मौजे जाकिमिऱ्या, ता. रत्नागिरी, जि. रत्नागिरी येथील स्मारकासाठी निधी मंजूर करण्याबाबत.......**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. स्मारक- ३१०९/प्र. क्र. ५०/२९**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,**
**दिनांक : १६ ऑगस्ट, २०१८**

वाचा:-१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. स्मारक- ३१०९/प्र. क्र. ५०/०९/२९, दिनांक ३१ मार्च,२०१०
२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.स्मारक-३११०/प्र.क्र.५०/२००९/२९,दिनांक १८ नोव्हेंबर, २०१०
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.स्मारक-३१०९/प्र.क्र.५०/२९, दिनांक १३ एप्रिल,२०१८
४) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-२, दिनांक २ एप्रिल,२०१८
५) जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे पत्र क्र. RAT-PLAN-३/कै.बा.सा.स्मा./१७२१/१८,दिनांक २२ मे,२०१८

**प्रस्तावना:**

कै.बाळासाहेब सावंत यांचे मौजे जाकिमिऱ्या, ता. रत्नागिरी, जि. रत्नागिरी येथे स्मारक बांधण्यासाठी रु. १०४.९३ लाख इतक्या रकमेच्या आराखडे व अंदाजपत्रकास उपरोक्त अनु. क्र. २ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून अनु. क्र. १ येथील शासन निर्णयान्वये रु. ५०.०० लाख उपलब्ध करुन देण्यात आले आहे. सदर रकमेच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी सादर केले आहे. अनु. क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये या स्मारकाच्या रु. १५६.०९ लाख इतक्या रकमेच्या आराखडे व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

सदर स्मारकासाठी उर्वरित रु. १०६.०९ लाख इतका निधी उपलब्ध करुन देण्याबाबत जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी दिनांक २२.०५.२०१८ च्या पत्रान्वये मागणी केली आहे. सदर निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

कै. बाळासाहेब सावंत यांचे मौजे जाकिमिऱ्या, ता.रत्नागिरी, जि.रत्नागिरी येथील स्मारकाच्या उर्वरित कामासाठी रु. ७४.२६ लाख ( रुपये चौ-याहत्तर लाख सव्वीस हजार फक्त ) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक -ए-४,
मुख्य लेखाशीर्ष, २०५९ सार्वजनिक बांधकामे
८०- सर्वसाधारण, ८००-राज्य योजना
(००)(०२) राष्ट्रपुरूष/थोर व्यक्ती यांची स्मारके व पुतळे यांचे बांधकाम
(२०५९ ३१७७), ५३ मोठी बांधकामे

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ मधील परि. ९ मध्ये नमूद केल्यानुसार ठेव बांधकामाच्या स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग न करता चालू आर्थिक वर्षामध्ये स्मारकाच्या कामासाठी खर्च करण्याची जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी दक्षता घ्यावी.

४. उपरोक्त निधीमधून खर्च करण्यासाठी सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, रत्नागिरी (सांकेतांक क्रमांक १४०१००१०३९) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधीच्या खर्चाची, निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल, मुंबई यांना सादर करण्याची तसेच महालेखापालांच्या लेख्यांशी खर्चमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांची राहील.

५. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ अनुसार व वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र. क्र. ६९/ अर्थसंकल्प-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद ६ (क) व परिच्छेद ८ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१८१७१६२५८८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chhaya Kiran Wadte

Digitally signed by Chhaya Kiran Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=f311bd8712a7b94b3b73d0e88ad01cf3a49c098bcd5f62e16e7135388baa523c, serialNumber=5bac345149360802f8cd3e4ab4ec174f2fec1bff420e81931e638ee6cdfcc12d, cn=Chhaya Kiran Wadte
Date: 2018.08.18 17:24:20 +05'30'

**( छा. कि. वडते )**
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३. मा.पालकमंत्री, जिल्हा रत्नागिरी यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. अप्पर मुख्य सचिव, (र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव, (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. जिल्हाधिकारी, रत्नागिरी
७. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
८. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२ नागपूर
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२ नागपूर
११. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी
१२. निवासी उपजिल्हाधिकारी, रत्नागिरी
१३. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, रत्नागिरी
१४. कक्ष अधिकारी (कार्या-२५ / कार्या-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. कक्ष अधिकारी (कार्यासन व्यय- ४/अर्थसंकल्प-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. कार्यासन अधिकारी, (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवडनस्ती कार्यासन २९, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई